विस्तारीत महात्मा ज्योतिराव फुले जन आरोग्य योजना व आयुष्मान भारत -प्रधान मंत्री जन आरोग्य योजना या योजनांच्या प्रभावी अंमलबजावणीसाठी संबंधित जिल्ह्याच्या मा. पालकमंत्री यांच्या अध्यक्षतेखाली जिल्हास्तरीय पालक जन आरोग्य संरक्षण कार्यकारिणी समिती स्थापन करण्याबाबत..

**महाराष्ट्र शासन**
**सार्वजनिक आरोग्य विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः मफुयो-२०२५/प्र.क्र.४१/आरोग्य-६**
गोकुळदास तेजपाल रुग्णालय आवार, संकुल इमारत,
१० मजला, मंत्रालय, मुंबई -४०० ००१
दिनांक: १९ मार्च, २०२५

**वाचा :-**

१) शासन निर्णय क्रमांकः सार्वजनिक आरोग्य विभाग शासन निर्णय क्रमांक मफुयो-२०२३/ प्र.क्र.१६०/आरोग्य-६, दिनांक २८ जुलै, २०२५
२) मुख्य कार्यकारी अधिकारी, राज्य आरोग्य हमी सोसायटी, वरळी, मुंबई यांचे क्र. राआहसो/ तनि/कास१/११५१९/१५२/२०२५, दिनाक २९.०१.२०२५

**प्रस्तावना :-**

शासन निर्णय दिनांक २८ जुलै, २०२३ अन्वये एकत्रित महात्मा ज्योतिराव फुले जन आरोग्य योजना व आयुष्मान भारत- प्रधानमंत्री जन आरोग्य योजना योजनेचे विस्तारीकरण करण्यात आले आहे. सदर योजना दिनांक १० जुले, २०२४ पासून राज्यात लागू करण्यात आला आहे. दिनांक २८ जुलै, २०२३ च्या शासन निर्णयातील परिशिष्ट -१ नुसार गठीत करण्यात आलेल्या जिल्हा संनियंत्रण व तक्रार निवारण समिती जिल्हाधिकारी (संबंधित जिल्हा) यांच्या अध्यक्षतेखाली स्थापन करण्यात आली आहे. विस्तारित महात्मा ज्योतिराव फुले जन आरोग्य योजना व आयुष्मान भारत- प्रधानमंत्री जन आरोग्य योजना या योजनांची प्रभावीपणे अंमलबाजवणी व्हावी, याकरिता संबंधित जिल्ह्याच्या पालकमंत्री यांच्या अध्यक्षतेखाली जिल्हास्तरीय पालक जन आरोग्य संरक्षण कार्यकारिणी गठीत करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

## शासन निर्णय:-

विस्तारीत आयुष्यमान भारत - प्रधान मंत्री जन आरोग्य योजना व महात्मा ज्योतिराव फुले जन आरोग्य योजनेची अधिक प्रभावी व पारदर्शकपणे अंमलबजावणी व्हावी याकरिता संबंधित जिल्ह्याचे

पालकमंत्री महोदय यांच्या अध्यक्षतेखाली तयार करावयाच्या समितीचे वा कार्यकारिणीची रचना खालीलप्रमाणे असेल -:

| जिल्हास्तरीय पालक जन आरोग्य संरक्षण कार्यकारिणी | | |
|---|---|---|
| **अ.क्र.** | **पदनाम** | **पद** |
| १ | मा. पालकमंत्री | अध्यक्ष |
| २ | मा. संसद सदस्य (संबंधित जिल्हा) | सदस्य |
| ३ | जिल्ह्यातील सर्व मा. विधीमंडळ सदस्य (संबंधित जिल्हा) | सदस्य |
| ४ | जिल्हाधिकारी | सदस्य |
| ५ | मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद | सदस्य |
| ६ | आयुक्त, महानगरपालिका/मुख्य कार्यकारी अधिकारी, नगरपालिका | सदस्य |
| ७ | जिल्हा आरोग्य अधिकारी | सदस्य |
| ८ | जिल्हा शल्य चिकित्सक | सदस्य - सचिव |

मा. अध्यक्ष यांच्या निर्देशानुसार अन्य विभागांचे शासकीय अधिकारी, पदाधिकारी व तज्ञ व्यक्ती यांना -"विशेष निमंत्रित" म्हणून आमंत्रित करता येईल.

**जिल्हास्तरीय पालक जन आरोग्य संरक्षण कार्यकारिणीची कार्यकक्षा खालीलप्रमाणे असेल -:**

१) जिल्हात राबविण्यात येणाऱ्या विस्तारीत महात्मा ज्योतिराव फुले जन आरोग्य योजना व आयुष्मान भारत प्रधान मंत्री जन आरोग्य योजना या योजनेंचा आढावा घेणे.

२) योजनेच्या अंमलबजावणीबाबत जिल्हा सनियंत्रण व तक्रार निवारण समितीच्या कामकाजाचा आढावा घेणे.

३) योजनेंतर्गत लाभार्थ्यांकडून प्राप्त होणाऱ्या तक्रारींचा आढावा घेऊन त्यांचे निवारण करण्यासाठी जिल्हा संनियंत्रण व तक्रार निवारण समितीला निर्देश देणे.

४) योजनेची संपूर्ण जिल्ह्यात प्रभावी अंमलबजावणी व्हावी याकरिता जिल्हयातील जिल्हा सनियंत्रण व तक्रार निवारण समितीला आवश्यक सूचना व मार्गदर्शन करणे.

५) योजनेचा जिल्ह्यात करण्यात येणारा प्रचार व प्रसिध्दीबाबत आढावा घेणे.

६) सदर समितीची बैठक दर ३ महिन्यांनी आयोजित करण्यात यावी.

२. विस्तारीत महात्मा ज्योतिराव फुले जन आरोग्य योजना व आयुष्मान भारत प्रधान मंत्री जन आरोग्य योजना संदर्भातील दिनांक २८ जुलै, २०२३ च्या तरतुदी व यातील **"परिशिष्ट अ"** प्रमाणे स्थापन करण्यात आलेल्या समित्यांची रचना पूर्वीप्रमाणेच राहील.

३. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०२५०३१९१७५५३४०९१७ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

ASHOK MAROTI ATRAM

Digitally signed by ASHOK MAROTI ATRAM
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=PUBLIC HEALTH DEPARTMENT,
2.5.4.20=e212845163abd708717bb4bef92b6886b147679a5af5a494e268689ab8d696dd, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=5F7ECA1F400D866EA34324CEA1A547AA04F0DA0794A00BEE126E8678172A15C5, cn=ASHOK MAROTI ATRAM
Date: 2025.03.19 17:56:41 +05'30'

**(अ.मा. आत्राम)**
**सह सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१) मा. राज्यपाल यांचे प्रधान सचिव, राजभवन, मुंबई
२) मा. मुख्यमंत्री, यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई
३) मा. उपमुख्यमंत्री (नगर विकास) यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई
४) मा. उपमुख्यमंत्री (वित्त व नियोजन) यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई
५) मा. मंत्री, आरोग्य व कुटुंब कल्याण यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई
६) मा. मंत्री (सर्व) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई
७) मा. विरोधी पक्षनेता, विधानपरिषद/विधानसभा, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, विधानभवन, मुंबई
८) मा. राज्यमंत्री, सार्वजनिक आरोग्य व कुटुंब कल्याण, मुंबई
९) मा. राज्यमंत्री (सर्व) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई
१०) सर्व मा. विधानपरिषद/ विधानसभा सदस्य, विधानमंडळ, विधानभवन, मुंबई- २१
११) मुख्य सचिव, महाराष्ट्र राज्य, मुंबई
१२) अपर मुख्य सचिव/ प्रधान सचिव-१, सार्वजनिक आरोग्य विभाग, मंत्रालय, मुंबई
१३) अपर मुख्य सचिव/प्रधान सचिव/ सचिव, सामाजिक न्याय व विशेष सहाय्य, विभाग, मंत्रालय, मुंबई
१४) अपर मुख्य सचिव/ प्रधान सचिव/सचिव, सर्व मंत्रालयीन विभाग, मंत्रालय, मुंबई
१५) प्रधान सचिव, विधानमंडळ सचिवालय, विधानभवन, मुंबई
१६) आयुक्त, आरोग्य सेवा व कुटुंब कल्याण तथा अभियान संचालक, राष्ट्रीय आरोग्य अभियान मुंबई -०१
१७) विभागीय आयुक्त (सर्व)
१८) मुख्य कार्यकारी अधिकारी, राज्य आरोग्य हमी सोसायटी, वरळी, मुंबई
१९) अतिरिक्त आयुक्त, बृहन्मुंबई महानगरपालीका, मुंबई

२०) जिल्हाधिकारी (सर्व)
२१) संचालक, आरोग्य सेवा संचालनालय, मुंबई
२२) संचालक, वैद्यकिय शिक्षण विभाग, बृहन्मुंबई महानगरपालीका, मुंबई
२३) संचालक, वैद्यकिय शिक्षण व संशोधन संचालनालय, मुंबई
२४) जिल्हा शल्य चिकित्सक (सर्व)
२५) संचालक, माहिती व जनसंपर्क संचालनालय, मंत्रालय, मुंबई
२६) सहसंचालक/उपसंचालक, आरोग्य सेवा परिमंडळे (सर्व)
२७) जिल्हा माहिती अधिकारी (सर्व)
२८) अधिष्ठाता, शासकीय वैद्यकिय महाविद्यालये व रुग्णालये (सर्व)
२९) सह सचिव /उप सचिव/ सर्व कार्यासने सार्वजनिक आरोग्य विभाग, मंत्रालय, मुंबई